**मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठ नागपूर, औरंगाबाद येथील अधिकारी /कर्मचाऱ्यांसाठी ६४० इतके All in One Personal Computers खरेदी करण्याकरिता रु. ४,९०,८८,०००/- इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र. संप्रिसा -२०१९/प्र.क्र. १९/का. ०७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : २७ ऑक्टोबर, २०२०.**

<u>वाचा</u> :- केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांची दिनांक १७.०५.२०१९, १३.११.२०१९ व १४.०२.२०२०.

**<u>प्रस्तावना</u> :-**

केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भान्वये मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठ नागपूर, औरंगाबाद येथील अधिकारी /कर्मचाऱ्यांसाठी ६४० इतके All in One Personal Computers खरेदी करण्याकरिता रु. ४,९०,८८,०००/- इतक्या रकमेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्तावास विभागाच्या दिनांक ११.०९.२०२० रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मा. उच्च न्यायालय, मुंबई व त्यांचे खंडपीठ नागपूर, औरंगाबाद येथील अधिकारी /कर्मचाऱ्यांसाठी ६४० इतके All in One Personal Computers खरेदी करण्याकरिता रु.४,९०,८८,०००/- (रु. चार कोटी नव्वद लक्ष अठ्ठयाऐंशी हजार फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खरेदी उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक२४.०८.२०१७ व ०८.१२.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार विहित पध्दतीने करण्यात यावी.

३. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-१ उप विभाग-२ मधील अ. क्र. २७ (अ) नियम क्र. ७६ मधील २ व ३ या अटींच्या अनुषंगाने प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३९३/२०२०/व्यय-५, दिनांक ०८.०९.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. यानुषंगाने निधीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२२१७१३०१७३१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nitin Virsen Jiwane

Digitally signed by Nitin Virsen Jiwane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, serialNumber=38da45fc182de9210d4220cd41371018a4d6f00892e5d1478cba8413afb06c03, cn=Nitin Virsen Jiwane
Date: 2020.10.28 17:31:32 +05'30'

**( नि. वि. जिवने )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव.**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता),-१/ २, मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, मुंबई/नागपूर,
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. संचालनालय, लेखा व कोषागारे , ठाकरसी हाऊस ३, मुंबई पोर्ट ट्रस्ट, २ रा मजला, शुरजी वल्लभदास मार्ग, बेलार्ड इस्टे, मुंबई.
११. सह सचिव, २३ व २४, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. निवड नस्ती.